**अंगणवाडी सेविका / मदतनीस / मिनी अंगणवाडी सेविका यांचे मानधन अदा करण्यासाठी अर्थसंकल्पित केलेला निधी वितरीत करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महिला व बाल विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः एबावि-२०२१/प्र.क्र.८६/का.६**

नवीन प्रशासन भवन, ३ रा मजला,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : - २९ मार्च, २०२२

**वाचा :-** महिला व बाल विकास विभाग, शासन निर्णय क्र.एबावि-२०२१/प्र.क्र.८६/का.६, दि.२६.४.२०२१, दि.६.५.२०२१,दि.३.६.२०२१,दि.३०.६.२०२१, दि.२७.७.२०२१ दि.२५.०८.२०२१,दि.३०.०९.२०२१, दि.१८.१०.२०२१, दि.१.१२.२०२१, दि.२७.१.२०२२ व दि.०४.०२.२०२२

**शासन निर्णय :-**

आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, नवी मुंबई यांच्या अधिनस्त एकात्मिक बाल विकास सेवा योजना ही केंद्र पुरस्कृत योजना राबविण्यात येते. केंद्र शासनाकडून विहीत कालावधीत निधी प्राप्त होत नसल्यामुळे अंगणवाडी सेविकांचे मानधन अदा करणे शक्य व्हावे, याकरिता अपर मुख्य सचिव (वित्त) यांच्या अध्यक्षतेखाली दिनांक २ जून, २०१७ रोजी आयोजित बैठकीत अंगणवाडी सेविकांच्या मानधनाची अर्थसंकल्पित केलेली रक्कम अपेक्षित केंद्रीय सहाय्य अप्राप्त असले तरी खर्च करण्यास विभागास अनुमती देण्याचा निर्णय घेण्यात आलेला आहे.

२. सदर शासन निर्णयान्वये अंगणवाडी सेविका, मदतनीस व मिनी अंगणवाडी सेविका यांचे मानधन अदा करण्याकरिता खालील विवरणपत्रातील रकाना क्रमांक-२ मधील प्रधान लेखाशीर्ष/उपशीर्ष/उद्दिष्टामध्ये रकाना क्रमांक-४ मध्ये दर्शविल्यानुसार घट करण्यात येत असून रकाना क्रमांक-५ प्रमाणे पुनर्वितरण / पुनर्विनियोजनाने वाढ करण्यात येत आहे. त्यानुसार रकाना क्रमांक २ मधील प्रधान लेखाशीर्ष/उपशीर्ष/उद्दिष्टामध्ये पुनर्विनियोजनानंतरच्या विद्यमान तरतुदीमधून रकाना क्रमांक-७ मध्ये दर्शविल्यानुसार एकूण रूपये १२७५.०० लाख एवढा निधी वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे. सदर प्रयोजनासाठी लेखाशीर्षनिहाय अर्थसंकल्पीय तरतुद व प्रस्तावित वितरण खालीलप्रमाणे

(रुपये लाखात)

| अं. क्र. | लेखाशिर्ष व बाब | विद्यमान तरतूद | पुनर्वियोजन / पुनर्वितरणाने होणारी घट | पुनर्वियोजन / पुनर्वितरणाने होणारी वाढ | पुनर्वियोजन / पुनर्वितरण नंतरची तरतुद | वितरीत करण्यात येत असलेला निधी |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ |
| १ | २२३६, पोषण आहार<br>१०१, विशेष पोषण आहार कार्यक्रम,<br>(०८) एकात्मिक बाल विकास सेवा योजना प्रकल्प<br>(०८) (०२) एकात्मिक बाल विकास सेवा योजना (सर्वसाधारण खर्च) (राज्य हिस्सा ४०%) (कार्यक्रम)<br>२२३६ १९१८<br>०२-मजूरी | ३१६५६.६१ | (-) ३००.०० | --- | ३१३५६.६१ | ---- |
| २ | (०८) (०५) अंगणवाडी सेवा<br>(अति.राज्य हिस्सा १००%( (कार्यक्रम)<br>२२३६ १९४५<br>१९-आहार खर्च | ७५०.०० | (-) ७५०.०० | --- | --- | --- |

| अ. क्र. | लेखाशिर्ष व बाब | विद्यमान तरतूद | पुनर्वियोजन / पुनर्वितरणाने होणारी घट | पुनर्वियोजन / पुनर्वितरणाने होणारी वाढ | पुनर्वियोजन / पुनर्वितरण नंतरची तरतुद | वितरीत करण्यात येत असलेला निधी |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ |
| ३ | २२३६, पोषण आहार<br>०२, पोषक अन्न व पेये यांचे वितरण<br>०५१, बांधकाम<br>(०१) अंगणवाडी बांधकाम<br>(०१) (०३) अंगणवाडी इमारत बांधण्यासाठी अंमलबजावणी करणा-या संस्थांना अनुदान (अति.राज्य हिस्सा १००%( (कार्यक्रम)<br>२२३६ २२०८<br>२७- लहान बांधकामे | २२५.०० | (-) २२५.०० | --- | ---- | --- |
| ४ | २२३६, पोषण आहार<br>१०१, विशेष पोषण आहार कार्यक्रम,<br>(०८) एकात्मिक बाल विकास सेवा योजना प्रकल्प<br>(०८)(०५) अंगणवाडी सेवा (अति.राज्य हिस्सा १००%( (कार्यक्रम)<br>२२३६ १९४५<br>०२-मजूरी | ६९२५०.५० | ----- | (+) १२७५.०० | ७०५२५.५० | १२७५.०० |
| | **एकूण** | **१०१८८२.११** | **(-) १२७५.००** | **(+)१२७५.००** | **१०१८८२.११** | **१२७५.००** |

३. हा शासन निर्णय नियोजन विभाग अनौपचारिक संदर्भ क्रमांक ८३/१४७२, दिनांक १७.०३.२०२२ तसेच वित्त विभागाने अनौपचारिक संदर्भ क्रमांक ११३/व्यय ६, दिनांक २८.०३.२०२२ अन्वये दिलेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२२०३२८१८१४५९७०३० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

VARUDKAR MAHESH ASHOKRAO

Digitally signed by VARUDKAR MAHESH ASHOKRAO
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WOMEN AND CHILD DEVELOPMENT DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=d93c4961d98086877a4048296211d7af97ecfd40d7967c43d20b360d83ce0fa6, pseudonym=58C42BF9F3ABBB1C15CFBC42D0AA8503E42564DB, serialNumber=7EBBBC3712E8D459EF90BF7AAE4EA46E9CAEBDD50CFECDE2EE7CE0454FA0416A, cn=VARUDKAR MAHESH ASHOKRAO
Date: 2022.03.31 17:07:32 +05'30'

**(महेश वरूडकर)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) महालेखापाल, महाराष्ट्र-१/२ (लेखा व अनुज्ञेयता)/(लेखा परिक्षा), मुंबई/नागपूर.
२) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
३) निवासी लेखापरिक्षा अधिकारी,मुंबई
४) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
५) आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, रायगड भवन, नवी मुंबई.
६) आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य पुणे.
७) सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी (जिल्हा परिषद)
८) सर्व जिल्हा कार्यक्रम अधिकारी (महिला व बाल विकास ) (जिल्हा परिषद)

९) सर्व बाल विकास प्रकल्प अधिकारी ( ग्रामीण/नागरी/आदिवासी) प्रकल्प
१०) वित्त विभाग (व्यय/६ ,अर्थसंकल्प-७), मंत्रालय, मुंबई.
११) नियोजन विभाग (का.१४७२), मंत्रालय,मुंबई.
१२) कक्ष अधिकारी (का-४), महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३) निवड नस्ती -का-६.